अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१४-२०१५ "२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१)(०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय/ उपविभागीय आस्था (२२१५ १८४३), दत्तमत"

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३

मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २५ मार्च, २०१५

**वाचा**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३ दिनांक २ जानेवारी, २०१५

२) शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक ५ मे, २०१४
३) शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक २० सप्टेंबर, २०१४
४) शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक ३० ऑक्टोंबर, २०१४
५) शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक २१ जानेवारी, २०१५

**प्रस्तावना**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील अधिकारी /कर्मचारी वर्ग-१ व वर्ग-२ यांचे वेतन व इतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक "वाय-२ २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणीपुरवठा-००१, संचालन व प्रशासन (०१) (०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय /उपविभागीय आस्थापना (२२१५ १८४३) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी एकूण रुपये २४,५८,७४,०००/- (अक्षरी रुपये चोवीसकोटी,अठावन्न लक्ष, चौ-याहत्तर हजार फक्त) इतकी तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी ०१ वेतनासाठी रुपये २३,७६,९८,०००/- (अक्षरी रुपये तेवीस कोटी, शहात्तर लक्ष, अठयाण्णव हजार फक्त) व ११ देशांतर्गत प्रवास खर्चासाठी रुपये ८१,७६,०००/- (अक्षरी रुपये ऐक्याऐंशी लक्ष, शहात्तर हजार फक्त )इतकी तरतूद करण्यात आली आहे.

२. वरील प्रमाणे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानापैकी ११ देशांतर्गत प्रवास या उपशिर्षाखाली, माहे एप्रिल ते जुलै २०१४ या चार महिन्यासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रुपये २७,२४,०००/- इतकी, माहे ऑगस्ट ते नोव्हेंबर या ४ महिन्यांसाठी संदर्भ क्र.४ शासन निर्णयान्वये रु.२१,८१,६००/- इतकी व माहे डिसेंबर ते मार्च या ४ महिन्यांसाठी संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वेय रु. १६,३५,२००/- इतकी रक्कम वितरीत करण्यात आली आहे.

३. आता, वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार दिनांक १/१/२०१५ ते ३१/०३/२०१५ या कालावधीतील आस्थापनाविषयक खर्च भागविण्यासाठी "२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ २२१५ १८४३" या लेखाशीर्षाखाली ११ देशांतर्गत प्रवास साठी रुपये ४,०८,८००/- (अक्षरी रुपये चार लक्ष, आठ हजार आठशे फक्त) इतके अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले आहे. मंजूर झालेले अनुदान संबंधीत मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, सर्व जिल्हा परिषद यांना उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

## शासन निर्णय

सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षाकरिता "२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणीपुरवठा-००१,संचालन व प्रशासन(०१)(०१)पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय/उपविभागीय आस्थापना (२२१५ १८४३) (दत्तमत)", ०१ वेतन व ११ देशांतर्गत प्रवासखर्चासाठी (मागणी क्र.वाय-२)" या लेखाशिर्षाखाली रुपये २४,५८,७४,०००/- (अक्षरी रुपये चोवीस कोटी, अठठावन्न लक्ष, चौ-याहत्तर हजार) इतक्या रक्कमेची तरतूद करण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र राज्यातील जिल्हा परिषदांतील ग्रामीण पाणी पुरवठा विभागातील व उपविभागातील अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतनेत्तरवरील खर्च भागाविण्यासाठी लेखाशिर्ष २२१५ १८४३, ११ देशांतर्गत प्रवासखर्च या उपलेखाशिर्षाखाली सोबतच्या विवरणपत्र-अ मधील स्तंभ-५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे रुपये) रुपये ४,०८,८००/- (अक्षरी रुपये चार लक्ष, आठ हजार आठशे फक्त) इतकी रक्कम संबधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व) यांना मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहिल. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र- अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही, याची दक्षता सर्व संबधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी घ्यावी. सदर खर्च संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या मासिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर खर्च मागणी क्र.वाय-२, "२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणी पुरवठा-००१, संचालन व प्रशासन (०१)(०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय/उपविभागीय आस्थापना(२२१५ १८४३) (दत्तमत)" ११ देशांतर्गत प्रवासखर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/ प्र. क्र. ८५/ अर्थसंकल्प-३, दिनांक ०२ जानेवारी, २०१५ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१५०३२५१६२२०५६३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MHASKE GAURI RAHUL

Digitally signed by MHASKE GAURI RAHUL
DN: CN = MHASKE GAURI RAHUL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918027
Date: 2015.03.26 11:20:56 +05'30'

**गौरी रा. म्हस्के**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विभागीय आयुक्त सर्व
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे.
५. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
६. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
७. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता,
८. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१०. महालेखापाल, महाराष्ट्र - १ मुंबई (लेखा परिक्षा( (५ प्रतीस)
११. महालेखापाल, महाराष्ट्र - १ मुंबई (लेखा अनुज्ञेयता((५ प्रतीसह)
१२. महालेखापाल, महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा परिक्षा( (५ प्रतीसह)
१३. महालेखापाल, महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा अनुज्ञेयता( (५ प्रतीसह)
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर
१७. वित्त विभाग (व्यय-३ व अर्थ-१९)
१८. कार्यासन क्रमांक पापु-०४ व २०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१९. ग्राम विकास व जलसंधारण विभागा (५प्रती)

**विवरणपत्र-अ**

शासन निर्णय पा.पु.व स्व.वि.क्रं.बजेट-२०१४/ प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक २५ मार्च, २०१५ चे सहपत्र

लेखाशिर्ष - २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा, ००१, संचालन व प्रशासन (०१) (०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय/उपविभागीय आस्थापना (२२१५ १८४३), ११ देशांतर्गत प्रवासखर्च

( रुपये हजारात)

| अ.क्र. | जिल्हयाचे नांव | सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षामध्ये १ जानेवारी २०१५ ते ३१ मार्च २०१५ या कालावधीसाठी मुक्त करण्यात आलेले अनुदान. | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | उपलेखाशीर्ष ०१ वेतन | उपलेखाशीर्ष ११ प्रवास खर्च | लेखाशीर्ष २२१५ १८४३ खाली वितरीत करण्यात येत असलेली रक्कम एकूण अनुकमांक (३+४) | लेखाशीर्ष २२१५ १८४३ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ठाणे | ० | २५ | २५ | (अक्षरी पंचवीस हजार फक्त) |
| २ | रायगड | ० | १२ | १२ | (अक्षरी बारा हजार फक्त) |
| ३ | रत्नागिरी | ० | ४३ | ४३ | (अक्षरी त्रेचाळीस हजार फक्त) |
| ४ | सिंधुदूर्ग | ० | ९.८ | ९.८ | (अक्षरी नऊ हजार आठशे फक्त) |
| ५ | नाशिक | ० | १९ | १९ | (अक्षरी एकोणीस हजार फक्त) |
| ६ | धुळे | ० | २५ | २५ | (अक्षरी पंचवीस हजार फक्त) |
| ७ | नंदुरबार | ० | ७ | ७ | (अक्षरी सात हजार फक्त) |
| ८ | जळगांव | ० | ५ | ५ | (अक्षरी पाच हजार फक्त) |
| ९ | अहमदनगर | ० | १२ | १२ | (अक्षरी बारा हजार फक्त) |
| १० | पुणे | ० | १४ | १४ | (अक्षरी चौदा हजार फक्त) |
| ११ | सातारा | ० | २० | २० | (अक्षरी वीस हजार फक्त) |
| १२ | सांगली | ० | ७ | ७ | (अक्षरी सात हजार फक्त) |
| १३ | सोलापूर | ० | १२ | १२ | (अक्षरी बारा हजार फक्त) |
| १४ | कोल्हापूर | ० | ५ | ५ | (अक्षरी पाच हजार फक्त) |
| १५ | औरंगाबाद | ० | १० | १० | (अक्षरी दहा हजार फक्त) |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १६ | जालना | ० | ५ | ५ | (अक्षरी पाच हजार फक्त) |
| १७ | परभणी | ० | ५ | ५ | (अक्षरी पाच हजार फक्त) |
| १८ | हिंगोली | ० | १२ | १२ | (अक्षरी बारा हजार फक्त) |
| १९ | बीड | ० | ६ | ६ | (अक्षरी सहा हजार फक्त) |
| २० | नांदेड | ० | ५ | ५ | (अक्षरी पाच हजार फक्त) |
| २१ | उस्मानाबाद | ० | ५ | ५ | (अक्षरी पाच हजार फक्त) |
| २२ | लातूर | ० | १२ | १२ | (अक्षरी बारा हजार फक्त) |
| २३ | बुलढाणा | ० | १० | १० | (अक्षरी दहा हजार फक्त) |
| २४ | अकोला | ० | ६ | ६ | (अक्षरी सहा हजार फक्त) |
| २५ | वाशिम | ० | १२ | १२ | (अक्षरी बारा हजार फक्त) |
| २६ | अमरावती | ० | १४ | १४ | (अक्षरी चौदा हजार फक्त) |
| २७ | यवतमाळ | ० | ५ | ५ | (अक्षरी पाच हजार फक्त) |
| २८ | वर्धा | ० | ५ | ५ | (अक्षरी पाच हजार फक्त) |
| २९ | नागपूर | ० | ४७ | ४७ | (अक्षरी सत्तेचाळीस हजार फक्त) |
| ३० | भंडारा | ० | ५ | ५ | (अक्षरी पाच हजार फक्त) |
| ३१ | गोंदिया | ० | २ | २ | (अक्षरी दोन हजार फक्त) |
| ३२ | चंद्रपूर | ० | २१ | २१ | (अक्षरी एकवीस हजार फक्त) |
| ३३ | गडचिरोली | ० | ६ | ६ | (अक्षरी सहा हजार फक्त) |
| | **एकूण** | ० | ४०८.८ | ४०८.८ | **(अक्षरी रुपये चार लक्ष आठ हजार आठशे फक्त)** |

MHASKE GAURI RAHUL

Digitally signed by MHASKE GAURI RAHUL
DN: CN = MHASKE GAURI RAHUL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918027
Date: 2015.03.26 11:21:14 +05'30'

**गौरी रा. म्हस्के**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**